केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (SMSP) ग्राम बिजोत्पादन कार्यक्रम योजनेकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय निधीतून वितरीत करणेबाबत.
(राज्य हिस्सा लेखाशिर्ष २४०१बी२७७)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२१/प्र.क्र. २९/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १७ जानेवारी, २०२२

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
४) कृषि व पदुम विभाग नस्ती क्र.योजना-३३२१/प्र.क्र.१३५/१-अे,

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (SMSP) ग्राम बिजोत्पादन कार्यक्रम या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०१-पीक संवर्धन, (००) (७८९)-अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (२०) कृषी उन्नती योजना-बियाणे लावड उप अभियान (राज्य हिस्सा ४०टक्के) (कार्यक्रम) (२४०१B२७७) या लेखाशिर्षाखाली रु.४००.०० लाख इतका नियतव्यय मंजूर आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली असून कार्यक्रमांतर्गत योजनांच्या ६० टक्के मर्यादेत खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. कृषी उन्नती योजना-बियाणे लावड उप अभियान या योजनेसाठी वित्त विभागाने केंद्र हिश्याच्या समरुप राज्य हिस्सा वितरीत करण्यास मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातंर्गत कृषि व पदुम विभागाने वाचा क्र.४ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार कृषी उन्नती योजना-बियाणे लावड उप अभियान या योजनेसाठी सन २०२०-२१चा अखर्चित निधी सन २०२१-२२ मध्ये खर्च करण्यास राज्य हिस्सा ४०टक्के (२४०१B२७७) या लेखाशिर्षाखाली रु.४००.०० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, कृषी व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वयेन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.११३९/२१/व्यय-१४, दि.०३.०१.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११९१२३४१८२३२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.01.19 12:35:28 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग